निर्मितीही वास्तव होते.

वृद्ध मातापित्यांना आपल्या घरापासून दूर ठेवून आपल्या बायकोला सुखी करण्याची फॅशन आजघडीला वाढतच चालली आहे. 'संघर्ष' कथेत अशाच प्रकारचा एक अनुभव चित्रित झाला आहे. वृद्ध व आजारी आईविषयीच्या तिरस्काराने मुकुंदाचे मन भरून गेले आहे. त्यामुळे तीर्थयात्रेच्या नावाखाली तिला तीर्थक्षेत्री नेऊन सोडून देण्याच्या विचाराने तो आईला तीथक्षेत्री घेऊन आला आहे. तेथे आई झोपेत असतानाही "देवा.....माझ्या मुकुंदाला.....सुखी...सुखी कर...!" असे पुटपुटताना पाहतो - ऐकतो आणि आईचे प्रेम व महत्त्व त्याला पटते. तो आईला पुन्हा घरी घेऊन येतो. या कथेतही मूल्यसंस्कार महत्वाचा ठरतो.

'वादळ' कथेतही एका बाजूला प्रलय व दुसऱ्या बाजूला माणसांच्या दुष्टप्रवृत्तींचा संघर्ष चित्रित झाला आहे. स्त्री द्वेष, जाती द्वेष, अस्पृश्यता यांच्या गर्तेत सापडलेला समाज जर सुधारत नसेल तर नियतीच प्रलयासारख्या अस्त्राचा वापर करून दृष्टांना कसे शासन करते हे दर्शविले आहे.

'कलंदर' संग्रहातील 'व्रतस्थ' कथा मात्र थोडीसी वेगळी आहे. सेहेचाळीस साली डॉ. राम मनोहर लोहियांनी नागरिक स्वातंत्र्याची जी चळवळ सुरू केली त्यात स्वतःला झोकून, सत्याग्रही बनून, तुरुंगवास भोगून आलेला विनायकराव या देशप्रेमीची ही कथा आहे. आजूबाजूला बोकाळलेला भ्रष्टाचार, लाचलुचपत या गोष्टी उघड्या डोळ्यांनी ते पाहातात. पण स्वतः या साऱ्यापासून दूर राहून गांधीवादी विचारसरणीच्या प्रभावाने आश्रम चालवतात. चरखे सुरू करतात. शाळा सुरू करतात. आश्रयाला येणाऱ्या वृद्धांना, तरुण-तरुणींना कपडे विणण्याचे काम देतात. मामेबहिणीशी वडिलांनी ठरवलेले लग्न ब्रम्हचर्य व्रतामुळे नाकारतात. मात्र ती मुलगी - विभावरी - जिने पूर्वी सत्याग्रहात भाग घेतला होता, तीही आश्रमात येऊन सेवाकार्य करू लागते. तिच्याबद्दलचा प्रेमभाव मात्र विनायकरावांच्या मनाच्या कोपऱ्यात सतत ताजा राहिलेला असतो. तिचे लग्न दुसऱ्याकडे ठरल्याचे कळताच ते अस्वस्थ होतात. तत्त्वनिष्ठेपायी ते स्वतःचे मन मारीत होते. दुसऱ्या बाजूला राजकारणात शिरलेल्या गुंडांचा, गुंड प्रवृत्तींचा त्यांना तिरस्कार वाटतो. निवडणुकीतील विजयी गुंड उमेदवाराची मिरवणूक पाहताना त्यांना आपला सारा भूतकाळ आठवतो. आणि आपल्या सेवेची, त्यागाची समाजात उपेक्षाच झालेली जाणवते. त्यामुळे ते उदास बनतात. पराभूतपणाची जाणीव त्यांना होते. याही कथेचा कलात्मक शेवट वाचकाला विचारप्रवृत्त करतो. मला येथे नुकतेच मी त्यांच्या 'सूड' कथेच्या निमित्ताने त्यांच्या दुखऱ्या मनाचे दर्शन घडविले, त्याचे स्मरण होते.

'ब्लॅकीस्ट' संग्रहातील 'सूड' कथेचा बाज वेगळा आहे. मनोरमेचा नवरा राजाराम सासुरवाडीला सासूची विचारपूस करण्यासाठी गेलेला असताना त्यावेळी संधी साधून पोर्तुगीज सरकारच्या गुप्त पोलीस दलाचा प्रमुख आजेंत काज्मीर मोंतेरो राजारामाच्या घरावर धाड टाकतो, ते केवळ मनोरमेच्या सौंदर्याने मोहित होऊन आणि हे सौदर्य भोगण्याच्या कामुक लालसेने. यावेळी या खलनायकाला चकवा देऊन पळून जाण्यात मनोरमा यशस्वी होते व अनर्थ टळतो. तिची अब्रु वाचते. शुध्द, पवित्र माणसाला वाचवणे, संरक्षण देणे हे मूल्य येथे महत्त्वाचे आहे. या कथेतील सूक्ष्म तपशीलाची वर्णने मुद्दाम अभ्यासण्यासारखी आहेत. लेखनातील विकासाचे टप्पेही त्यातून दाखविता येतील.

अशा अनेक कथांचा उल्लेख करता येईल.

या साऱ्या कथांतून माणुसकीचा झरा सतत वाहताना दिसतो. कथांतून होणारे संस्कार पुढील पिढीवर सतत होत राहाण्याची आवश्यकता आहे. पु. शि. नार्वेकरांच्या क़था हे कार्य निश्चितपणे भविष्यात करीत राहतील यात शंका नाही.

'नवमीच्या मध्यरात्री' हे तीन अंकी संगीत ऐतिहासिक नाटक आहे. ह. ना. आपटे यांच्या मूळ 'गड आला पण सिंह गेला' या कादंबरीवरून हे नाटक लिहिले आहे. नाटकाची रचना दोन मुख्य उपकथानकामध्ये विभागली आहे. "आधी लगीन कोंडाण्याचं अन् नंतर रायबाचं" हे तानाजीचे उद्गार या मुख्य सूत्राबरोबरच संग्रामसिंहाची मुलगी - कमलकुमारी - हिचा नवरा या लढाईत मारला गेल्यामुळे रजपूत प्रथेप्रमाणे कमलकुमारी सती जाण्याची तयारी करते आहे. मूळ कादंबरीत ती शेवटी सती जाते. परंतु नाटककाराने त्यात बदल करून शिवाजी महाराज तिला दीनदुबळ्यांची सेवा करीत आयुष्य घालविण्याचा सल्ला देतात, असा शेवट केला आहे. कथालेखनात नार्वेकरांचा जो दृष्टीकोन आहे, तोच नाटकातही दिसून येतो. या सुधारणावादी दृष्टीकोनामागे जीवनातील मूल्यसंकल्पनांचेच जतन लेखकाने केले आहे, हे लक्षात येते. या नाटकाचा एकमेव प्रयोग १९९७ साली साकोर्डे येथे झाला होता, अशी माहिती मला मिळाली.

या संदर्भात जेव्हा मी त्यांचा 'द्यूतचक्र' हा महाभारतावरील ललित लेखांचा प्रसंगवर्णनपर ग्रंथ वाचला तेव्हा एक विचार माझ्या मनात आला की, जर नार्वेकर दुसऱ्या एखाद्या कादंबरीवरून ऐतिहासिक नाटक लिहू शकतात तर महाभारतातील अनेक गोष्टींबद्दल त्यांची स्वतंत्र मते असताना त्यांना यांचा आधार घेऊन आणखी नाट्यनिर्मिती करावीशी का वाटली नाही?

'द्यूतचक्र' या ग्रंथात महाभारतातील प्रसंगवर्णनपर अशा १८ ललित लेखांचा समावेश झाला आहे. महाभारतावर अनेक विचारवंतांनी विविध दृष्टीकोनातून प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केलेला आहे. दुर्गा भागवतांचे 'व्यासपर्व', इरावती कर्वे यांचा 'युगान्त', प्रा. द. गो. दसनूरकर यांचे 'आपला महाभारत', आनंद साधलेंचे 'हा जय नावाचा इतिहास आहे' इत्यादी ग्रंथांचा उल्लेख करता येईल. पु. शि. नार्वेकरांनी महाभारताचा अभ्यास करून त्यावर गंभीरपणे मनन-चिंतन केलेले आहे. काही लेखकांनी महाभारतातील मूळ प्रसंग, मूळ व्यक्तिरेखा समजून न घेता त्यांचे उदात्तीकरणही केले आहे. पु. शि. नार्वेकर मात्र गोष्टीपासून दूर राहून सत्याच्या जवळ जाण्याचा प्रयत्न करताना दिसतात.

वेगाने फिरणाऱ्या द्यूतचक्रात सापडलेल्या माणसाचा सर्वनास अटळ असतो. महाभारत हे त्या दृष्टीने महत्त्वाचे महाकाव्य आहे. त्यातील काही घटनांचा, व्यक्तींचा सृजनशील अंगाने विचार करून या ललित लेखांची निर्मिती नार्वेकरांनी केली आहे.

'महाभारतातील द्रौपदीवस्त्रहरणाचा प्रसंग हा त्या महाकाव्यातील केंद्रबिंदू." (द्यूतचक्र, पृ. १) असे नार्वेकरांना वाटते. द्रौपदीला जुगाराला जुंपणेच मुळी चुकीचे. अशा घटनेने नार्वेकर व्यथित होतात. म्हणून त्यांच्या मनात विचार उमटतात....'जुगारी माणूस इतका बेभान कसा होतो? वास्तविक संबंध महाभारतात युधिष्ठिरासारखा शांत, विचारी, धर्मशील माणूस दुसरा नाही. पण त्याचा तोल कसा गेला?" असे अनेक प्रश्न त्यांना पडतात. त्याचे उत्तर शोधताना ते सांगतात, "द्रौपदीची विटंबना ही प्राचीन भारतीय इतिहासातील सर्वात काळीकुट्ट घटना आहे. सुसंस्कृत म्हणविणारे लोकही सूडाच्या भावनेने कोणत्या थरास जाऊ शकतात याचे हे उदाहरण आहे." (द्यूतचक्र,

पृ. ७)

कृष्ण, अर्जुन, भीम, भीष्म, द्रौपदी, कुंती, दुर्योधन, दु:शासन, धृतराष्ट्र, गांधारी अशा अनेक व्यक्तींवर प्रकाश टाकून त्यांच्यातील माणूसकीचे स्वरूप शोधण्याचा नार्वेकरांचा प्रयत्न निश्चितच नोंद घेण्यासारखा आहे.

'द्यूतचक्र'मध्ये जसा एक अभ्यासू व चिंतनशील विचारवंत लेखक दिसतो, तसाच 'शरदबाबूंच्या नायिका' मध्येही दिसतो. शरच्चंद्र चटर्जींच्या साहित्याचे नार्वेकर चाहते आहेत. शरच्चंद्रांच्या कादंबऱ्यांतील नायिकांची विविध असाधारण रूपे पाहून नार्वेकर भारावून गेले. अशा १० नायिकांचा (किरणमयी, सावित्री, अन्नदा, राजलक्ष्मी, सुमित्रा, भारती, अलका, विराज ललिता, कमल) विचार दहा लेखांमध्ये त्यांनी केला आहे. यातील काही नायिका रूढ मार्गाने जाणाऱ्या नसूनही त्यांच्याबद्दल त्यांना अनादर वाटत नाही, काही नायिका अवैध मार्गाने जाणाऱ्या आहेत तर काही आदर्श भारतीय परंपरेतील आहेत. लौकिकदृष्ट्या पतिता पण मूळच्या सत्प्रवृत्त अशाही नायिका आहेत. या पार्श्वभूमीवर शरदबाबूंचे बहुतेक नायक त्यांना दुबळे वाटतात. म्हणूनच नार्वेकर म्हणतात, ''शरदबाबूंच्या नायिका या त्यांच्या नायकांपेक्षा अधिक कणखर वाटतात. त्या निर्णय घेऊ शकतात. संकटात त्या डगमगत नाहीत. स्वत:च्या साऱ्या शक्ती पणाला लावून संसाराचा कोसळणारा डोलारा सावरण्याचा प्रयत्न त्या करतात. कधी त्या त्यात यशस्वी होतात तर कधी विराजसारख्या स्वत:च कोसळतात. पण त्या अयशस्वी प्रयत्नातही त्यांचे आगळेवेगळे सामर्थ्य प्रकट होतेच. त्यामुळे शरदबाबूंच्या नायकांपेक्षा त्यांच्या नायिकाच वाचकांच्या जास्त लक्षात राहातात.'' (शरदबाबूंच्या नायिका, पृ. ७)

'आषाढधारा' या ललितलेख संग्रहात ३१ लेखांची माला गुंफलेली आहे. या लेखातून त्यांचे नाट्यवेड प्रकर्षाने जाणवते. अनेक लेखांतून त्यांचे यासंबंधीचे अनुभव व विचार लालित्यपूर्ण शैलीत चित्रित झालेले आहेत. त्याचबरोबर त्यांचे चित्रपट प्रेम, साहित्य प्रेम, संगीत प्रेमही दिसून येते. या सर्वांतून लालित्यपूर्ण समीक्षा दिसून येते. काही ठिकाणी संशोधकाचा स्पर्शही लेखनाला झालेला दिसतो. उदाहरणार्थ 'दशावतारी नाटके' या लेखाची सुरूवातच पहा, ''दशावतारी नाटकांची परंपरा आजकालची नाही. आद्य मराठी नाटककार विष्णुदास भावे यांना सांगली संस्थानच्या महाराजांनी दक्षिण कोकणात करीत असलेल्या दशावतारी नाटकांच्या धर्तीवर नाटके लिहा असे सांगितल्याचे उल्लेख सापडतात. यावरून मराठी नाटकांचा जन्म होण्यापूर्वी दशावतारी नाटके कोकणात चालू होती असे दिसते.'' (पृ. १२७)

'द्यूतचक्र', 'शरदबाबूंच्या नायिका' व 'आषाढधारा' हे तिन्ही ग्रंथ वाचल्यानंतर लक्षात येते की विद्यापीठीय क्षेत्राबाहेरील असूनही नार्वेकर हे उत्तम समीक्षक आहेत.

❖ ❖ ❖

# ओढ



अपूर्वा उत्कर्ष कर्पे

नेहमीप्रमाणे सकाळी मॉर्नींग वॉकला जाऊन आल्यावर मनोहररावांनी दूधाची पिशवी आणून टेबलवर ठेवली, व ते वर्तमानपत्र वाचण्यात गुंग झाले. माधवीताईने ते दूध तापत ठेवलं व दुसरीकडे चहाचं आधण ठेऊन त्या गॅसजवळच उभ्या राहिल्या, दूध ऊतू जाईल म्हणून. कालच्या फंक्शनची धुंदी अजून डोळ्यावरून उतरली नव्हती. मनोहररावांच्या सहकाऱ्याच्या पंचाहत्तराव्या वाढदिवसाला ते गेले होते. सोहळा अगदी दृष्ट लागण्यासारखा झाला. भाषणं काय, हार तुरे काय, शुभेच्छा द्यायला लोकांच्या रांगा काय पण सर्वात जास्त त्यांना लक्षात राहिलं ते त्यांच्या सर्व मुलां, सुनां, जावई मुलींनी पंच्याहत्तर पणत्या पेटवून त्यांचं केलेलं औक्षण! कित्ती कौतुक! कित्ती समाधान! दोन्ही मुलगे, दोन्ही मुली, सुना, जावई कसे हॉलभर हवं नको ते पहात होते. सुना, जावई अवती-भवती रूंजी घालत होत्या....नंतर वेगवेगळे पोझीस घेऊन फोटो सेशन झालं, एकमेकांना घास भरवायचा कार्यक्रमही झाला. उत्साह, आनंद याना नुसत उधाण आलं होतं. खुप भाग्यवान आहेत, चांगल्या भरल्या गोकुळात नांदतात!..... मनोहररावांची पंच्याहत्तरीपण पुढच्याच वर्षी येईल...पण मुलं नातवंडांनी साजरा करायचा असतो हा दुर्मीळ सोहळा! आपला साजरा

करायला आहे कोण? त्यांनी खोलवर निश्वा:स टाकला...

माधवीताईंना फार आवड घरभर गजबजलेल्या लोकांची! त्या तशाच फॅमिलीतून आल्या होत्या. त्यांच्य वाड्यात तीन काका, त्यांची मुलंबाळं, एक विधवा आत्या, आजोबा एवढे सगळे गुण्यागोविंदाने नांदत. पण इथे मनोहर केसरकरांच्या फॅमिलीत लग्न होऊन आली नी लोकच दिसेनात! मनोहर, त्यांची आई नी लग्नाची नणंद एवढच काय ते कुटुंब. दोन वर्षात नणंदही लग्न होऊन गेली....रहाता राहिले मनोहर, माधवी नी सासूबाई! माधवीताई व सासू दोघींच दिवसभर घरात असत. मनोहररावांची फिरती नोकरी होती. मेडिकल रिप्रेझेंटेटीव्ह होते ते! सकाळी जायचे नी संध्याकाळी घरी परतायचे. घर खायला यायचं माधवीला! हळू हळू तीही सवय झाली. माधवी गरोदर राहिली तेव्हा सहाव्या महिन्यावर जमीनीवर घसरून पडली. लागलं नाही, पण बाळंत होईस्तोवर हालचाल करण्यावर बंदी आली. सासूने, मनोहरने खूप जपलं, बाळंतपणात खूप कॉम्प्लीकेशन्स झाली. मुलाच्या व माधवीच्या ब्लड ग्रूप मधे पोझीटीव्ह-नेगेटीव्हचा फरक होता. कसंतरी बाळाला वाचवलं. माधवीपण सिरियसच होती. डॉक्टरांनी आणखी चान्स घ्यायला बंदी केली नी एकुलत्या एक मुलावरच समाधान मानावं लागलं.

मुलाचं नाव समर्थ ठेवलं. त्याला तळहातावरच्या फोडाप्रमाणे जपत त्याला वाढवलं. तोही आई आई म्हणत तिच्या मागे मागेच असायचा. कॉलेजमध्ये जायला लागला नी शेजारी एक ख्रिश्चन फॅमिली राहायला आली. सिंथीया समर्थबरोबरची. त्याच्याच वर्गात होती. शेजारीच असल्याने घरी ये-जा चालायची. शेवटच्या वर्षाला असताना समर्थने गौप्यस्फोट केला. त्याचं सिंथीयावर प्रेम होतं व त्याला तिच्याशीच लग्न करायचं होतं. घरात नुसता हा:हा:कार झाला. मनोहररावांनी व्हीलनची भुमिका घेतली. शेवटी व्हायचं तेच झालं. दोघंही पळून मेले. तेव्हापासून ना पत्र लिहिलं, ना फोन केला....कुठं असेल समर्थ? कसा असेल तो? असं कां वागला तो? एका क्षणात मायेची सगळी बंधनं तटातट तोडून दिली! माधवीताईंच्या डोळ्यांच्या कडा पाण्यांनी भरल्या. गॅसवरच दूधही दिसेना....

चहा गाळून त्यांनी मनोहरावांना हाक मारली. एरवी अखंड बडबड करणारी माधवी गप्प गप्प पाहून मनोहररावांनी माधवीला खुणेनेच काय झालं म्हणून विचारलं. मानेनंच काही नाहीच उत्तर देऊन ती टेबलावर रेघोट्या ओढत राहिली. ''आठवण आली समर्थची?'' शांततेचा भंग करत मनोहर म्हणाले. ''हं!'' दिर्घ सुस्कारा सोडत ते म्हणाले, ''मी पण मघाचपासून विचार करत होतो....किती छान झालं कालचं फंन्शन!....माझीही पंच्याहत्तरावी आलीच की पुढच्या वर्षी!....पण दोघेच काय म्हणून साजरी करणार?....ती मुला नातवंडानी साजरी करायची असते.''

''मग? आता का पश्चाताप करता? त्या वेळी अगदी हिटलर संचारला होता तुमच्यात!..... कसे वागलात?...अगदी पुराण मतवादी....घरची परंपरा जपणारा माणूस होतात तुमी...आता या वयात पश्चाताप करून काय फायदा?....कुठं असेल पोर कोण जाणे! कसा असेल?'' माधवीने एवढा वेळ महातप्रयासाने दाबून ठेवलेले अश्रू खळ्ळकन् बाहेर आले. तसं दु:खी अंत:करणानं मनोहर तिच्या खांद्यावर थोपटत राहिले....

''कां असं ताड्ताड् बोललात हो माझ्या मुलाला? आधीच भित्रा ससा तो!....आणखीनच घाबरून गेला तुमचा तो अवतार बघून!....काय झालं असत, जरा नरमाईनं घेतलं तर?.....कोवळं वय....

झालं प्रेम! प्रेमाला कुठं कळते जात नी धर्म?..... शेजारीच रहायची, घरात सतत ये जा असायची.... आवडली त्याला! पोरगी होती पण लाघवी!....मग ख्रिश्चन असली काय, नी हिंदू काय...रूळली असती हळू हळू आपल्या घरात!'' माधवीताईचा आवाज हळू हळू रागीट होऊ लागला.

"अगं! आता कळतंय मला ते आजूबाजूला पाहतो....जिकडे तिकडे हेच चित्र दिसतंय.....थोड्या फार फरकाने!....पण तेव्हा अशी परिस्थिती नव्हती! कर्मठ विचारात वाढलेलो मी.....शिवाय आईनेही अन्नपाणी वर्ज्य केलं!....शिवाय....खरं सांगू?.... तो असं करेल असं वाटलंच नव्हतं मला....वाटलं, घाबरेल, विचार बदलेल, आम्ही पसंत केलेल्या मुलीशी गपगुमान लग्न करेल....थोडे दिवस होईल त्रास! पण हळू हळू सगळं मार्गी लागेलं.....पण हा पळून गेला तिला घेऊन...बरं, एखाद पत्र तरी पाठवावं! फोन तरी करावा.....अगदी संबंधच तोडून टाकले....'' आता मनोहररावांचा आवाजही कापरा झाला. डोळ्यातले अश्रू बाहेर यायच्या आत ते झटकन् खोलीबाहेर गेले.

वातावरणातली उदासीनता वाढतच राहिली तसं ताण हलका करण्यासाठी ते लायब्ररीची पुस्तक घेऊन निघाले. वेगळ्या वातावरणात मनाची परिस्थिती बदलेल या आशेन लायब्ररीत गेले.

आंघोळ करून, पूजेसाठी फुलं काढायला परडी घेऊन माधवीताई बागेत आल्या. बागेतली झाडं फार उंच वाढली होती. फुलं वर हेलकावे खात होती. वाऱ्याबरोबर पण हाती काही लागेनात.

"कित्तीदा सांगितलं यांना...एका काठीला हुक लाऊन द्या....जमत नाही मान वर करून फुलं काढायला म्हणून...'' माधवी ताई बडबडू लागल्या.

इतक्यात एक मुलगा तिथून जात होता. तिला पाहून थांबला व विचारू लागला. "आजी! थांबा, मी काढून देतो.'' उडी मारून फांद्या वाकवून त्याने हीऽऽ फुलं काढून दिली. "पुरे?'' ह्यानं फुलांनी शिगोशीग भरलेली परडी पुढे करत विचारलं.

"अं....हो हो! भरपूर झाली!'' त्या तंद्रीतून बाहेर येत म्हणाल्या. "नाव काय गे बाळ तुझं? कुठं राहतोस? नवीन दिसतोस.'' त्या प्रेमाने विचारू लागल्या.

"मी? मी आराध्य, इथं तुमच्या शेजारच्याच बिल्डींगमध्ये वरच्या फ्लॅटवर रहातो.''

साऊथ इंडियन दिसतोय. त्याला न्याहाळत माधवीताई मनातल्या मनात म्हणाल्या. त्यांच्या शेजारच्या बिल्डींगमधे नोकरी करणारी, शिकणारी अनेक मुलं रहात. ते दोघंही कौतुकाने त्या तरूण पोरांना पहात पण त्यांचं या म्हातारा म्हातारीकडे लक्षच नसायचं. हा पोरगा वेगळा होता. चांगले संस्कर झालेले दिसत होते.

देवपूजा आटोपून स्तोत्र म्हणता म्हणता का कोण जाणे तो मुलगाच सारखा डोळ्यासमोर येत राहिला. बिच्चारा! आई वडिलांपासून दूर शिक्षणासाठी आला असेल. कोण आहे मायेचं जवळ?....कधी सणावाराचं गोडधोड केलं तर द्यायला हवं....कां कोण जाणे त्या पोरानं हुरहुर लावली.

संध्याकाळी फिरायला निघताना माधवीताईनी विचारलं, "आज देवघर कसं फुलांनी भरून गेलं होतं नं? प्रसन्न वाटलं!'' "हो! अगं राहिलंच विचारायचं! कशी काढलीस फुलं?'' "तुम्ही नाही कां, छाऽन काठी करून दिलीत हुक लावलेली!'' त्यांना चिडवत माधवीताई म्हणाल्य. मनोहरराव गप्प चालत राहिले. मग माधवीताईनाच रहावलं नाही. त्यांनी त्या मुलाचं कौतुक केलं.

"अगं, तोच कां? काळासावळा....चष्मीस!

काल माझ्या पिशव्या आपल्या बाईकवरून गेटपर्यंत पोचवल्यान!....चांगला मुलगा आहे.'' मग ते दोघं आपापल्या विचारात गुंग होऊन वाट तुडवू लागले....

पावसामुळे घराबाहेर खुप निसरडं झालं होतं. कितीही पाय जपून ठेवले तरीही एका सकाळी मनोहरराव घसरून पडले. त्यांना उठताही येईना नी हाक मारताही येईना. ते उठायचा प्रयत्न करतच होते इतक्यात गेटचं दार वाजलं व धावत तो मुलगा आला. त्यांनं आपल्या हातांनी आधार देत मनोहररावांना उठवलं व भक्कम बाहुंचा आधार देत घरात नेलं.

''काय झालं...का...य?'' माधवीताई किंचाळत समोर आल्या.

''काही नाही! जरा शांत हो....घसरलो जरा!'' तिला हाताच्या इशाऱ्यानं शांत करत मनोहरराव म्हणाले.

त्या मुलान त्यांना कॉटवर बसवलं. आपणच स्वयंपाकघरातून पाणी घेऊन आला. ''आजोबा, लागलं नाही ना, फार? सूज वगैरे आली नाही ना? पाहू... पाहू!'' त्यानं माधवी ताईकडे मूव्ह मागून ते बरच रगडलं.

''अरे, खरंच काही लागलं नाही रे! घाबरलो मी....या वयात काही झालं तर....'' परक्या पोरांन दाखवलेल्या आपुलकीने ते भारावून गेले.

''माझ्याकडे ब्रुफेन आहे....आलोच!'' तो लांब लांब ढेंगा टाकत गेलासुद्धा!

नशीबाने जास्त लागलं नव्हतं. ब्रुफेनने ते जाणवलं देखील नाही. दिवसभर माधवीनं त्यांना कॉटवरच हलू देखील दिलं नाही. दोघंही त्या पोराचं कौतुक करत राहिले दिवसभर.

संध्याकाळी दार वाजवत तो खांद्यावर बॅग घेऊन आत आला. सरळ कॉटकडे गेला. तेव्हा ते दोघेही आपली आवडती सिरीयल पहात होते. ''आजोबा, कसे आहात?'' म्हणत कॉटवर बसला. त्यांना खुप लाजल्यासारखं झालं. कोण कुठला पोर नी आपली एवढी काळजी करतोय....त्याचं मन सुपाएवढं झालं. माधवीताईनी त्याला चहा फराळ देत चौकशी केली......तो मुंबईचा डेंटल कॉलेजमध्ये ॲडमीशन मिळाली होती. त्याला एक बहिण होती. वडिल लेक्चरर होते व आई टिचर...

त्यानंतर आराध्य या ना त्या कारणानं घरी येत राहिला. कधी मनोहररावांना बाईकवर बँकेत ने, कधी फार्मसीतल्या गोळ्या, औषध आणून दे, कधी आर्जीबरोबर देवळात जा. एवढं की दोघांच्या तोंडी दिवसभर त्याचंच नाव असे. गोडधोड केलं, सणवार असला की त्याला जेवायला बोलवत. त्यांच्या व्हरांड्यात उभं राहून हाक मारली की खिडकीतून ओ द्यायच्या.

दिवस भराभर पळत होते. कधीच एक वर्ष संपलं. एक दिवस त्याला मनोहररावांनी हाक मारली पण तो खिडकीतून डोकावला नाही. संध्याकाळी ग्राऊंडवर फुटबॉल पण खेळायला आला नाही. मग माधवीताई काळजीने दुखऱ्या पायावर हात ठेवत पायऱ्या चढून वर गेल्या. दार ढकलले तर कॉटवर आराध्य पांघरूण लपेटून झोपला होता. कपाळाला हात लावून पाहिलं तर कडकडीत लागलं. मग माधवीताईंनी वेळ केला नाही. शेजारच्य फ्लॅटमधल्या मुलांची मदत घेऊन त्याला घरी आणले. डॉक्टरांना बोलावलं. रात्रभर त्याच्य कपाळावर पट्ट्या ठेवत दोघेही जागले. पहाटे त्याचा ताप उतरला. कण्हणं पण थांबलं. मग दिवसभर ताप आला नाही. पण विकनेस होता. मग आठ दिवस माधवीताईंनी त्याला बळजबरीनं ठेऊन घेतलं. खुप उत्साहात होते, दोघं नवराबायको. त्याचं हवं नको

पाहताना दोघांना वेगळाच आनंद मिळत होता.

आठ दिवसांनी आराध्य बॅग खांद्यावर टाकून निघाला तेव्हा त्याचे पाय जड झाले होते. मनोहरराव व माधवीताईंची परिस्थितीही काही वेगळी नव्हती. जेव्हा आराध्य वाकून पाया पडला तेव्हा मनोहररावांना गहिवरून आलं. त्याला पोटाशी धरून ते म्हणाले, ''किती लळा लावलास रे बाळा! तुझ्याशिवाय आता घर खायला येईल.....घरात एक प्रकारचं चैतन्य वावरत होतं बघ तुझ्या रूपानं....आता एवढ्या मोठ्या घरात एका टोकाला मी नी एका टोकाला ती!'' माधवीताईंनी ही डोळ्यांना पदर लावला. त्या मनातलं पटकन बोलून गेल्या, ''अहो, मग तो राहिना का आपल्याच घरात...., शिक्षण होईस्तोवर आपल्यालाही आधार नी त्यालाही!'' मनोहरराव तिच्याकडे पहातच राहिले.... म्हणाले, ''किती समर्पक बोललीस गं तू! हे नव्हतं आलं माझ्या डोक्यात.'' थोडे आढेवेढे घेऊन, मीनीमम् चार्जीस द्यायच्या अटीवर आराध्यही तयार झाला...

आता माधवीताई मनोहररावांचं आयुष्यच आराध्यच्या भोवती गुंफून गेलं. तो त्यांच्या जीवनाचा अविभाज्य घटक बनला. त्याच्या आवडीचं घरात शीजू लागलं. कधी कधी माधवीताई उदास होत. विचार करत की हा मुलगा उद्या शिक्षण संपल्यावर निघून जाईल....मग काय? पण आपल्या विचारांची साखळी तिथंच तोडत त्या म्हणत...सध्या आपण खूप आनंदात आहोत, त्याचा पुरेपुर उपभोग घेऊया... नंतरचं नंतर पाहू...कधी कधी रिकाम्या वेळेत माधवीताई आराध्यच्या डोक्याला मायेनं तेल लावत. त्याला मागच्या सगळ्या समर्थच्या आठवणी सांगत. आराध्यच्या आवडी, त्याच्या लकबी कशा समर्थशी मिळत्या जुळत्या आहेत ते सांगत.

होता होता, मनोहररावांचा पंच्याहत्तरावा वाढदिवस उजाडला. सकाळपासून माधवीताईंची लगबग चालली होती. ते तिघं देवळात गेले. कुलदेवतेची पूजा, अभिषेक केला. दुपारी मनोहररावांच्या आवडीचे बहुतेक सगळे पदार्थ केले. संध्याकाळी मात्र आराध्यनी सांगितलं की आता वाढदिवस आपण आपल्या पद्धतीने साजरा करणार....

आराध्यनी दोघांना चांगले कपडे घालायला लावले. एवढंच काय, माधवीताईंना दागिनेही घालायला लावले. टॅक्सीने ते एका हॉटेलमध्ये गेले. असं हॉटेल ते प्रथमच पाहात होते, त्यामुळे ते बावरल्यासारखे झाले. हॉटेलमधला एक स्यूट बुक केला होता. आतून तो फुलांच्या माळांनी सजवला होता. दारात रांगोळी घातली होती. दिवे लावून रोषणाई केली होती. तो थाटमाट दोघे नवराबायको पहातच राहिले.

त्यांना बसवून आराध्यने सांगितले, ''आजोबा! आजी! आज तुमच्या वाढदिवशी मी तुम्हाला दोन मोठी गीफ्टस् देणार आहे. दोन्ही अनमोल आहेत....पहिलं गीफ्ट! आजोबा, आजी माझं नाव आहे आराध्य समर्थ केसरकर....मी सख्खा नातू आहे तुमचा!'' त्याने दोघांना पायाला हात लावून नमस्कार केला. दोघे नवराबायको हबकून गेले होते. इतके की त्याला मीठीत घ्यायचं सोडून, एकमेकांचे हात घट्ट धरून फक्त रडत राहिले.

''आजी, तुम्ही जसं आमच्यासाठी तडफडत होता, तसंच आम्ही ही तुमच्यासाठी तडफडत होतो. तुमच्या गोष्टी ऐकतच आम्ही मोठे झालो. पप्पा सतत तुमची आठवण काढून उदास व्हायचे. शेवटी मी ठरवलं की या तीन ताटातुट झालेल्या जीवांना एकत्र आणायचंच! आणि देवानंही मला साथ दिली. मला इथंच ॲडमीशन मिळाली. मग मी थेट तुमच्या शेजारी रहायला आलो. तुम्हाला रोज मी खिडकीतून बघायचो. शेवटी हळूच मी तुमच्या एकलकोंड्या जीवनात प्रवेश केला.....माझ्या प्लॅनची सगळी स्टोरी मी पप्पांना

फोनवरून कळवत होतो....हे पहा, तेही आलेत तुम्हाला भेटायला....."

ओठावर हसू आणि डोळ्यांत आसू घेऊन समर्थ आत आला. माधवीताई उठून धावत आल्या मुलाच्या चेहऱ्यावरून आपला सुरकुतलेला हात फिरवत राहिल्या. पंधरा वर्षांची नात पाया पडायला वाकली तेव्हा मनोहररावांनी झटकन् तिला मिठीत घेत तिच्या कपाळाचं चुंबन घेतलं. हा सोहळा साश्रु नयनांने दूर उभं राहून पहाणाऱ्या सुनेला त्यांनी जवळ बोलावलं व पोटभर आर्शीर्वाद दिला. सर्वांनी आनंदोत्सव साजरा केला....हास्यकल्लोळात पूर्ण फॅमिली बुडून गेली. आज त्यांना कोणी उपरं माणूस नको होतं.

रात्री गाडीतून घरी जाताना माधवीताई हळूच मनोहररावांना कोपर मारत म्हणाल्या, "काय हो, कसा झाला पंचाहत्तरावा वाढदिवस?" आणि सगळी फॅमिली परत हस्यकल्लोळात बुडून गेली. दोन्ही हात कानावर ठेवत माधवीताईनी हाताची बोटं कडाकडा मोडली. "इडा पिडा टळो" त्या म्हणाला.

❖ ❖ ❖

# "आपली मुले : जबाबदारी की गुंतवणूक?"



लक्ष्मी शि. कामत

"मुले ही देवाघरची फुले" आपली मुले किंबहुना आताच्या काळात आपलं मूल असं म्हटलं तर काही गैर होणार नाही. कारण सद्याच्या काळात बहुतेक कुटुंबात एकच मूल असतं. कारण आताचा काळ हा पूर्वीसारखा नाही. पूर्वी एकत्र कुटुंब पद्धतीत मुलांचा जन्म होऊन ती थोडी मोठी झाली की ती आपल्या भावंडांबरोबर वाढायची आणि आजी आजोबांच्या कुशीत सुसंस्कारित व्हायची त्यासाठी आई वडीलांना फार मोठे कष्ट घ्यावे लागत नव्हते. त्यामुळे मुलांची संख्या कितीही असली तरी आईवडीलांना त्यांची मोठीशी चिंता नसायची पण ती मुले इतर भावंडांच्या सान्निध्यात फुलायची.

पण आताचा काळ फार बदललेला आहे. आजची महिला ही चूल आणि मूल एवढ्यातच समाधान मानत नाही. ती पुरुषाच्या बरोबरीने शिक्षण घेताना पहायला मिळते. प्रत्येक क्षेत्रात ती चमकताना दृष्टीस पडते. स्त्रीची शक्ती ही पुरुषापेक्षा काही ठिकाणी सरस ठरताना पहायला मिळते. ती आपलं करीअर करताना दृष्टीस पडते. स्त्री जेव्हा शिकत असते तेव्हा तिचीही काही उद्दीष्टे असतात. पुढे जेव्हा लग्न होऊन ती सासरी जाते तेव्हा ती अनेक नाती जपत जपत वावरत असते. असा तिचा प्रवास चालू असतानाच

तिला मातृत्त्वाची चाहुल लागते आणि ती पुरती मोहरुन उठते. मातृत्त्व प्राप्ती ही स्त्रीच्या जीवनाची पूर्तता. जेव्हा मुलांचा जन्म होतो तेव्हा ती इतर सर्व नात्यांना थोड्या काळाकरता विसरते. ती त्यावेळी आपल्या अपत्याचीच माता असते. या सर्व स्थित्यंतरांमध्ये तिच्या पतीने, तिच्या घरच्या इतर माणसांनी तिला सांभाळायला हवे. कारण त्यावेळी ती अतिशय नाजूक अशा मन:स्थितीतून जात असते.

प्रत्येक माता ही आपल्या अपत्याचे कोडकौतुक करते. त्याचे संगोपन अतिशय चांगल्या रितीने करते. पण ह्या सर्व कामांमध्ये तिच्या पतीने तिला साथ द्यायला हवी. तसेच मुलगा किंवा मुलगी असा भेदभाव न करता सारखीच वागणूक द्यायला हवी.

आपले मूल हे सुसंस्कारित बनवणे ही खरं तर प्रत्येक मातापित्याची जबाबदारी आहे. कारण त्या बालकाचं पालकत्त्व स्विकारणं हे आपलं काम असतं. आई किंवा बाप होणं कठीण नसतं पण एक सुजाण पालक होणं कठीण असतं. आपलं मूल हे नेहमीच चांगल काय वाईट काय यात फरक पाहायला शिकल पाहिजे व त्यातून चांगल ते घेण्याचा व वाईट ते सोडून द्यायचां विवेक त्यांच्यामध्ये निर्माण करणे हेही पालकांच काम. कारण उत्तम चारित्र्याची पिढी निर्माण झाली तर ती आपल्या देशासाठी ती एक उत्कृष्ट अशी अशी गुंतवणूक ठरणारच आहे पण पालकांनी पाहताना मुलाकडे गुंतवणूक म्हणून कधीच पाहू नये.

आपण जबाबदारारीने मुलांना वाढवत असताना आपल्या कृतीतूनच मुलांना धडे देऊ शकतो. तसेच शाळांमधूनही असे वातावरण निर्माण व्हायला हवे. खूप शिकलेली मुले सुसंस्कृत असतातच असे नाही. मुलांमध्ये फक्त पैसा म्हणजे सर्वस्व अशी भावना निर्माण होऊ देता कामा नये. तसेच पैशासाठी आपले स्वत्त्व गहाण टाकणाऱ्या लोकांपासून नेहमीच मुलांना सावध रहायला शिकवले पाहीजे. किंबहूना लहान मुलांना गरजेपेक्ष जास्त वस्तूंची चटक लावू देऊ नये. नेहमीच त्यांच्याकडे आपण जबाबदारीने पाहीले पाहीजे. उद. नवरा बायकोत काही मतभेद असतील तर ते मुलांसमोर उघडे करू नये व मुलांसाठी तडजोडही करावी. कारण मूल हे आपल्या संसारवेलीवर उमललेलं फूल असतं ते कोमजू न देणं हे आईवडीलाच कर्तव्य असतं.

दुसरी एक गोष्ट म्हणजे मुलांकडून कोणत्याही अपेक्षा ठेवू नये कारण अपेक्षा ठेवल्याच नाहीत तर अपेक्ष भंग होण्याचा प्रश्नच उद्‌भवणार नाही. उदा. एखाद्या मुलाने त्याच्या लग्नानंतर आपल्या पत्नीबरोबर दुसरीकडे राहाण्याचा प्रस्ताव मांडल्यास त्यामध्ये मोठेसे काही गैर आहे असे वाटून न घेता संमती दिल्यास आपल्यालाही त्रास होणार नाही.

आपलं मूल किंवा मुले कुठेही असली तरी चालतील पण ती सुसंस्कृत, सुसंस्कारित असून त्यांच्याविषयी चांगल ऐकायला मिळाल तरी आपण जबाबदारीने वागून त्याचं पालनपोषण योग्य प्रकारे केलं असं म्हणता येईल. तसेच काहीना अशी सवय असते की ती माणसे आपल्या मुलांना खूपच दबावाखाली ठेवतात व प्रत्येक गोष्टी आपणच करून देतात. तसे न करता काही वेळा मुलांवर जबाबदारी टाकून त्यांना निर्णय घ्यायला दिला तर ती हुशारीने आपला निर्णय आपणच घ्यायला सक्षम बनतात. शेवटी ठराविक काळापर्यंतच आपण आपल्या मुलांना साथ-सोबत करू शकतो त्यानंतर मुलाला आपलं स्वत:च व्यक्तिमत्त्व निर्माण करायचं असतं.

आजची पिढी व्यसनांनी भरलेली तसेच सत्तालालसेला चटावलेली तसेच अनेक वाईट गोष्टींना आपल्या जिवनात स्थान दिलेली दृष्टीस पडते. त्याचे

कारण आपण म्हणजेच पालक कुठे तरी कमी पडतो व दूरदर्शन किंवा इतर बाह्यमाध्यमाचा त्यांच्यावर पडणारा प्रभाव जास्त असेच आहे. ह्यावर उपाय म्हणजे लहानपणापासून मुलावर लक्ष दिलं पाहिजे. काही पालकांना वाटते आपण खूप महागडी खेळणी मुलांना दिली की आपली जबाबदारी संपली. पण तसे न करता मुलांना वेळ देणं महत्त्वाचे. आपण त्यांच्याशी खेळले पाहिजे. त्यातूनच त्यांच्यावर सुसंस्कार घडवले पाहिजेत. त्यासाठी मुलांना आदर्श व्यक्तींची चरित्रे आणून वाचून दाखवावीत मग त्याना हळूहळू वाचनाची गोडी लागेव व ती दूरदर्शन सारख्या माध्यमाच्या आहारी जाणार नाहीत. कारण दूरदर्शन हे असे माध्यम आहे की ज्याच्यामुळे अनेक चांगल्या गोष्टीही आपण घरबसल्या पाहू शकतो. पण चांगले काय याची आपल्या मुलांना आपणच माहीती करुन दिली पाहीजे नाहीतर ती नको तेच कार्यक्रम पहात राहतील. आपणही दिवसातला काही वेळ वाचन करावं. म्हणजे आई-बाबा वाचन करतात म्हणून मुलेही वाचू लागतील. आपणच जर टिव्हीवरील एखादी मालिका पाहण्यात गर्क राहून मुलांकडे दुर्लक्ष करत गेलो तर मुलेही तसच करायला लागतील.

आहाराविषयी दुरदर्शनवर दाखवतात त्या जाहीराती निव्वळ मालाचा खूप वाढवण्यासाठीच असतात. त्यातली आईही खरी नसते आणि तिने बनवलेला पदार्थही खरा नसतो. तो फक्त पैसे मिळवण्यासाठी निर्माण केलेला आभास असतो. हे जर मुलांना पटवून दिले तर ती तसले पदार्थ मागत नाहीत. याबाबतीत शिक्षकांचा व पालकांचा समन्वय असणे खूप गरजेचे. वर्गात जी गोष्ट शिक्षक सांगतात तीच गोष्ट जर घरी आई घरी सांगत असेल तर बालमनाचा गोंधळ उडत नाही. पण नेमकं वर्गात जे सांगितलं जात त्याच्या उलट आईनं सांगितलं तर मात्र बालमनाचा गोंधळ उडतो. म्हणून एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की पालकांचा शिक्षकांशी वारंवार सुसंवाद व्हायला हवा.

यासाठी एक गोष्ट म्हणजे आपली मुलं ही आपली केवळ जबाबदारी आहे. म्हणूनच त्यांच्याकडे पाहावे  व त्यांना वाढवावे ती गुंतवणूक आहे असे म्हणून कधीच पाहू नये पण जर आपण जबाबदारीने मुलांचे पालनपोषण केले. त्यांना वाढवले तर आपल्या ह्या कार्यामध्ये आपल्याला नक्कीच यश येईल व आपली पुढची पिढी जबाबदार, सक्षम अशी निर्माण झाली तर आपल्या देशाच्या दृष्टीने ती एक गुंतवणूकच असेल व त्या गुंतवणूकीमध्ये प्रत्येक आईवडीलांचा पालकांचा खारीचा वाटा असेल यात शंकाच नाही.

❖ ❖ ❖

# भेट



डॉ. सौ. रेखा पौडवाल

तो चौदा फेब्रुवारीचा दिवस होता. व्हेलेन्टाईन डे. प्रेमीकांचा दिवस. आज तिला त्याची राहुन राहुन आठवण होत होती. त्याला डोळे भरुन पाहण्याची आणि त्याचा आवाज ऐकण्याची तिची इच्छा अनावर झाली तेव्हा तिने झटकन मोबाईल उचलला. भरभर नंबर डायल करु लागली. अचानक ती थांबली. मोबाईलवर त्याच्याशी बोलू की नको? त्याला आवडेल की तो रागावेल? ह्या विचारांच मनात द्वंद्व सुरु झालं.

मनावर ताबा ठेवण्याचा तिने प्रयत्न केलातरी हृदयाच्या स्पंदनासमोर तिला हार खावी लागत होती. अस्वस्थेचा भुंगा मन कोरत होता. त्याला निदान त्यादिवशीतरी फोन केल्यावाचून तिला चैन पडणार नव्हती. शेवटी होतं नव्हतं ते सार अवसान गोळा करुन तिने त्याचा मोबाईलवर नंबर फिरविला. त्याचा मोबाईल नेहमीप्रमाणे आजही बंद असेल का? नाहीतर एन्गेज्ड तर नसेल ना? निराशेच्या झोपाळ्यावर मन हिंदोळे खात असतानाच त्याच्या फोनची रिंग वाजू लागली. आपण जणू गड जिंकला याप्रमाणे तिचा आनंद, गगनात मावेनासा झाला.

'हॅलो' तिकडून त्याचा स्वर कानी पडताच तिचं हृदय जोरजोराने धडधड करु लागले. सर्वांग

रोमांचीत झालं. त्याला आपल्या मनातल कसं सांगायचं हा विचार करीत असतानाच 'मला आज तुला भेटायचं आहे' असं एका दमात स्वतःच्या नकळत ती बोलून मोकळी झाली. बोलून झाल्यावर तिने एक दिर्घ श्वास सोडला आणि तिकडून होकार येताच आपले पाय जमीनीवर टेकत नाहीत, आपण हवेत तरंगत असल्याचा तिला भास झाला. दुपारी साडेतीनला मला थोडा वेळ मोकळा आहे तेव्हा तू भेटायला येऊ शकतेस असे जेव्हा त्याने सांगितले तेव्हा तिच्या मनाचा मोर थयथय नाचू लागला.

तिचं घर आणि ऑफिस अगदी जवळ जवळ असल्याने लंचसाठी ती घरी आली. घड्याळ्याने दीडचा ठोका दिला. तिला आणखीन दोन तास त्याच्या भेटीसाठी प्रतीक्षा करावी लागणार होती. प्रतिक्षेचा तो एक एक क्षण अगदी युगासारखा तिला वाटू लागला. त्या दीर्घ प्रतिक्षेत्त्या काळात एक प्रकारचं अस्वस्थपण, हुरहूर तगमग, एका अनामिक प्रीतीच्या भावनेने आनंदी होणं आणि वेळ निसटत नसल्यामुळे व्याकुळ होणं या सांमिश्र भावभावनांचं दडपण तिच्यावर वाढत गेलं. तिच्या मनाची आतुरता उतू जाणाऱ्या दुधाप्रमाणे झाली होती. ती जाण्याच्या तयारीला लागली. फेसवॉशने प्रथम तोंड धुतलं, पावडर-कुंकू लावलं, आता साडी नेसू की चुडीदार? त्याला काय आवडेल? माझ्यावर काय जास्त शोभून दिसेल? हा विचार करीत ती कपाटातील कपड्यांची उलथापालथ करु लागली. कपाटातील त्या हिरव्या-पिवळ्या चवकडीच्या चुडीदाराकडे तिचे लक्ष गेले आणि तो चुडीदार तिच्या डोळ्यात लगेच भरला. कारण 'तो' सुद्धा नेहमी चवकडीचाच शर्ट घालतो हे तिला चांगले ठाऊक होते.

ती लगबगीने ऑफिसमध्ये आली. तिथलं काम पटापट आवरलं. खरं तर आज तिचं कामात लक्ष लागणारच नव्हतं. त्याला भेटायला जायचंय...... समुद्राला मिळण्याकरिता लगबगीने धावणाऱ्या नदीची आतुरता तिच्या रोमरोमात संचारत होती. त्या कल्पनेन तिच्या अंगावर रोमांच उभे राहत होते. तिच्या ऑफिसपासून त्याचं ऑफिस बऱ्याचं अंतरावर होतं. इतकं दूर होतं की तिला दोन बसेस बदलाव्या लागणार होत्या. याचाच अर्थ प्रवासाचा क्षीण तिच्या चेहऱ्यावर उतरणार होता. घामेजलेल्या, मलूल चेहऱ्याने त्याच्यासमोर जाण्याची तिची इच्छा नव्हती. तिला आपला ताजातवाना, गुलाबाच्या फुलासारखा टवटवीत चेहरा घेऊन त्याच्या भेटीला जायचं होतं. म्हणून तिने थेट टॅक्सी करुन त्याच्या ऑफिसमध्ये जायचं ठरवलं. भले मग टॅक्सीवाला कितीही पैसे मागो. अनेक दिवस मनातल्या मनात, अगदी मनाच्या सातपाताळात लपवून ठेवलेलं गुपित आज ती त्याच्यासमोर उघडं करणार होती. आपलं प्रेम प्रदर्शित करणार होती. त्या गोड मनोराज्यात ती इतकी गुंग होऊन गेली की टॅक्सी त्याच्या ऑफिससमोर केव्हा थांबली हे तिला समजलेच नाही. दिलेल्या वेळेवर ती तर पोहचली होती, मात्र तो पोहचला नव्हता. शिपायाने 'साहेब अजून आले नाहीत, थोडं बसा' म्हणत तिला वेटिंग रुममध्ये बसवलं. आपण चुकीचे तर ऐकले नाही ना? ती संभ्रमात पडली. पुन्हा त्याला फोन लावला. 'आपण दोन मिनिटातच ऑफिसमध्ये पोहचतो' असं जेव्हा त्याने मोबाईलवरुन सांगितले तेव्हा तिच्या जिवात जीव आला. तिने दुपारपासून दोनतास प्रतीक्षा केली होती. पण आता...... दोन मिनिटे प्रतीक्षा करणं तिला जड जात होतं. तिच्या मनाची नाजूक तार क्षणाक्षणाला ताणली जात होती.

पुरुषांची मने, अंतःकरणे दगडासारखी असतात. पण स्त्रियांची मने मात्र फुलांइतकी हळवी असतात. विरहाची झळ लागलीकी कोमेजून जातात.

तो विरह तिला असह्य होत होता. ती व्याकुळ झाली होती त्याच्या भेटीसाठी. ती स्वत:च्या स्वप्नरंजनात इतकी दंग झाली होती की शिपायाच्या 'साहेब आलेत' या आवाजाने भानावर आली. आता ही अस्मरणीय व आनंददायक भेट ठरेल या आशेने आणि अपेक्षेने तिने त्याच्या केबिनमध्ये पाऊल टाकले. आपण आत शिरताच तो सुहास्य वदनाने आपलं भरभरुन स्वागत करेल या तिच्या अपेक्षेला तडा गेला. कारण ती आत शिरल्यावरही तो फाईलमध्ये डोके खुपसून कामात व्यस्त राहिला. इकडे तिच्या प्रीतीला भरती आली होती आणि तिकडे....? गोठलेल्या पाण्यासारखा तो भावशून्य होता.

शेवटी नाईलाजाने तिने स्वत:च आपलं केबिनमधील अस्तित्व त्याच्या निर्दशनासं आणून दिलं औपचारिकता म्हणून त्याने तिच्यासाठी चहा मागवला. नंतर 'काही काम आहे कां? असा निर्विकार प्रश्न केला. काम.....छे! काम तर काहीचं नाही. मी केवळ तुझ्याच भेटीसाठी इतक्या दुरुन आली आहे. आणि ..... का आले हे तुला खरंच सांगावं लागेल का? माझ्या डोळ्यातील प्रीतभावांवरुन ते समजले नाही कां रे? की ते समजूनही तू न समजण्याचं नाटक करतो आहेस? मनातले भाव न कळण्या इतका खुळा तू नक्कीच नाहीस. हे सारे विचार तिच्या मनात थैमान घालीत होते. पण तोंडातून शब्द फुटत नव्हता. समुद्र शिंपल्यात घालून कधी कुणाला दाखविता येतो का? फुलाचे चित्र काढून त्याचा गंध कुणाला देता येतो का? प्रीतीची, प्रेमाची अनुभूतीही तशीच असते. ती बोलून व्यक्त करायची नसते. अनुभवायची असते. नजरेने नजरेतील भाव जाणून घ्यायचे असतात. हृदयाने हृदयाची भाषा जाणायची असते. प्रीतीचे संगीत कानी पडायला दोन माणसांच्या मनांच्या तारा आधी जुळाव्या लागतात.

त्याच्या भेटीसाठी तिची उत्सुकता किती शिगेला पोहचली होती! पण प्रत्यक्षात ती भेट अपूर्णच ठरली. सतत जाचत आलेली एकटेपणाची टोचणी त्याच्या सहवासातही तशीच कायम राहिली. तिला वाटलं होतं, त्याने बेगडी प्रतिष्ठचं कवच तोडत तिच्याजवळ यावं, तिला आपलं म्हणावं. कदाचित त्यालाही तसचं वाटत असावं पण तसं तो करु शकत नव्हता. आपल्या मनातील भाव मनमोकळेपणाने व्यक्त करु शकत नसावा. दोघेही आपाआपल्या दृष्टीने अगदी बरोबर होती. पण त्याच्या बेर्पवाईमुळे तिच्या मनातल्या फुलांचे निर्माल्य झालं होते.

अपेक्षाभंगाच दु:ख हृदयात लपवून, चेहऱ्यावर स्मित हास्याचा मुखवटा धारण करून, धीटपणे हस्तांदोलन करून तिने त्याचा निरोप घेतला. येताना असणारा तिच्या सळसळता चैतन्याचा झरा पार ओसरला होता. जड पावलांनी त्याच्या केबिनच्या बाहेर निघून ती घरी परतली. घरी येताच पलंगावर तिने सर्वांग झोकून घेतले व उशीत तोंड खुपसून इतका वेळ चेपून धरलेल्या अश्रूंना तिने वाट मोकळी करुन दिली. अशी कोरडी, भावनाशून्य भेट होण्यापेक्षा त्याची भेट झाली नसती तरच बरं झालं असतं असं तिला वाटू लागलं. कारण भेट झाली नसती तर कधी ना कधी तो आपल्याला भेटेल ही आशा मनाची पालवी उल्हासित करण्यास व मनास उभारी देण्यास पुरेशी ठरली असती. माणूस आशेवर जगतो, मग ती आशा कितीही निराधार असो. माणूस स्वप्नावरही जगतो मग ती स्वप्नं कितीही असंभव असोत. ती आशा, तीं स्वप्नं दोन्हीची पूर्णता होऊ न शकल्याने प्रीतीचा जो बंगला. तिला संगमरवरी वाटला होता तो पत्त्यांचा ठरला होता.

❖ ❖ ❖



डॉ. रेखा पौडवाल

## कधी कधी

कधी कधी आपलेच डोळे
आपल्याशीच खोटं बोलतात
जे बाघीतलेलं असतं
ते नाकारायला लावतात.

कधी कधी आपलचं मन
आपल्याशीच बंड करतं
जाणून बुजून अंर्त:मनाच्या
विरुद्ध वागायला लावतं.

कधी कधी आपलं हृदय
कारणाशिवायही स्पंदन करतं
समोरच्याला ठाऊक नसताना
त्याला भेटायला जातं.

कधी कधी आपलं अस्तित्व
परस्वाधीन होऊन जातं
दुसऱ्याच्या आहारी जावून
स्वत:लाच विसरायला लावतं.

❖ ❖ ❖

# सूर्यबाला की कहानियों में समकालीनता



सपना सावईकर

लेखक द्वारा लिखा गया साहित्य अपने युग का समकालीन ही होता हैं। रचनाकार अपने समाज की छवि, अपने समय की यथार्थता को साहित्य में अभिव्यक्त करता हैं। यह समकालिनता रचना के उद्देश पर भी निर्भर करती हैं। वास्तव में समकालीनता का सीधा संबंध समसामीयकता से हैं। डॉ. अशोक भाटिया के अनुसार "वह रचना समकालीन कही जाएगी जो अपने समय के बोध को व्यक्त करें।"

समकालीन दौर में कई महिला रचनाकारों का लेखन कार्या जारी है, जिसमें सूर्यबालाजी का स्थान अपना  अलग ही महत्व रखता हैं। सूर्यबालाजी हिंदी की एक सशक्त एवं सफल लेखिका है। यांत्रिक, आत्मकेंद्रित, स्वार्थ से व्याप्त परिवेश में इनकी कहानियों की सौहार्द्रयुक्त कोमल अनुबंधों की स्नेहमय, सुगंधमय स्वस्थ ताजी बयार एक सुखद अनुभूति जगाती है। इनकी कहानियाँ बौद्धिकता, मानवीयता और जीवन के लिए पोषक दार्शनिकता के तानों-बानों से ग्रंथित हैं।

आज़ादी के बाद से सब तक आतंकवाद, नक्सलवाद सांप्रदायिक दंगे, जातिय दंगे जैसी समस्याएँ दिन-ब-दिन बढ़ती जा रही हैं। बाबरी मस्जिद जैसे नाजूक मामलों कां प्रभाव संपूर्ण भारत पर पड़ता

हैं। इन समस्याओं की वजह से समाज में हर समय भय का वातावरण फैला रहता हैं। कहीं भी दंगे हो तो उसका असर संपूर्ण देश पर पड़ता हैं। 'शहर की सबसे दर्दनाक खबर' इस कहानी में इसी बात को दर्शाया है। प्रस्तुत कहानी में कमाल साहब का नाम कर दिया जाता है, नेमप्लेट में सभी के नाम बदले जाते है और दंगेवालों को कमाल साहब चंद्रा टावर में रहते हैं, इस बात का पता न चले इसलिए कॉलनीवालों द्वारा पूरा खयाल रखा जाता हैं। वे सोचते हैं। - आखिरकर यह उनके साथ-साथ पूरी इमारत के सत्रह परिवारों की हिफाजत का सवाल हैं।'' वे कमाल साहब के परिवारवालों पर इतने बंधन लगाते हैं कि उस इलाके में उनका दम घुटने लगता है और वे अपने परिवार के साथ वहाँ से चले जाते हैं। सूर्यबाला की 'गृहप्रवेश' कहानी में भी यही दहशत चित्रित है। बीरू की बहन जब अपने भाई के गृहप्रवेश को जाने के लिए बच्चों के साथ तैयार होती है, तब उसका पति अपने ऑफिस से लौटकर उसे बताता है कि-जाना नहीं हो सकता, पूरे चौक एरिया में जबरदस्त सनसनी है। दुकानों के शटर खटाखट बंद हो रहे हैं। नई सड़क तक जिसे देखो, दुकान डलिया समेटे जल्दी-जल्दी घर भागने की फिराक में रिक्शा-ऑटो तलाश रहा था। अजब बदहवासी का आलम, बाजार, सड़क देखते-देखते वीगम।'' देढ़ महिने बाद जब वह अपने भाई के घर जाती है, तो देखती है कि रात के समय असुरक्षा की आशंका से उसके भाई ने गली के गुंडे को अपने साथ लाया है। घर पहुँचने के बाद वह देखती है कि भाई और भाभी किसी बात से परेशान हैं। उनके बीच बातें भी होती हैं तो वह भी चोरी, लुटपाट और दहशत भरे वातावरण पर। उनके बच्चे भी इस आतंक के प्रभाव से नहीं बच पाए हैं। वह देखती है कि भाई का मंटू सचमुच जाने कहाँ-कहाँ की पेटियाँ कमरबंद कसे, मुँह पर काला कपडा लपेटे, दुर्दांत डाकू बना खड़ा था और दोनों हाथों में पिस्तौल थामे खेल में वह अपने साथियों के साथ पूरे परिवार को धमका रहा था और घर की औरत को 'छमकछल्लो' संबोधित करता हुआ अपनी माँग पूरी न होने पर सबको गोलियों से भून दिए जाने की धमकी दे रहा था। उस घर के आस-पास के वातावरण से भयभीत, मंटू की माँ जब अपने पतिसे कहीं और जाकर बसने की बात करती है, तब लेखिका ने दुनिया भर की इस समस्या को अभिव्यक्त करते हुए लिख है लिखा है - ''पूछो इससे कि यह हिंदुस्तान ही नहीं बल्कि दुनिया के किस शहर में रहना पसंद करेगी, जो आज इसके लिए पूरी तरह निरापद हो''.

आज दुनिया में हम कहीं भी सुरक्षित नहीं हैं। वैज्ञानिक प्रगति ने जहाँ एक ओर विकास पाया है, वहीं दूसरी ओर आतंक के वातावरण को जन्म दिया है, जिसमें हर समय मृत्यु की आशंका बनी रहती है। गुंडागर्दी, चोरी, लुटपाट, आतंक भरे वातावरण में सामान्य लोगों का जीना मुश्किल होता जा रहा है। इन्हीं बातों का प्रतिबिंब उपयुक्त कहानियों में मिलता हैं।

देश को आजादी मिले ६६ साल बितने के बाद भी गरिबी की समस्या से आज़ादी नहीं मिली। सूर्यबाला की 'भुख्खड की औलाद' कहानी निम्नवर्ग के परिवार में व्याप्त विभिषिकाओं का उद्घाटन करती है। बैजनाथ और उसका परिवार अर्थाभाव और प्राकृतिक प्रकोप के यातना के चक्र में फँसा है। बैजनाथ अपनी जी तोड मेहनत और प्रामाणिकता के बावजूद भी भूखा ही है। न शहर न ही गाँव उसकी निम्नतम आवश्यकताओं की पूर्तिकर सकता है। पति की अनुपस्थिती में पत्नी सर्वनाशी बाढ़ में फँसी भैंस को बचाने के लिए अपने प्राणों की परवाह किए बिना

नदी में कूदती है। भैंस तो मरजाती हैं, लेकिन पत्नी जीवन भर अपंगता का शाप लिए जीवित रहती है। बैजनाथ के अनुसार भैंस का बचना ज्यादा जरूरी था जो कि उसकी आर्थिक दशा का आधार थी। लेखिका इस कहानी के माध्यम से इस से इस सत्य को उजागर करती है कि आज व्यक्ति से भी महत्वपूर्ण है वह वस्तु जो आर्थिक स्थिती का आधार हो।

आज समय बदल रहा हैं। मानव विकास के साथ-साथ परिवार में पारस्परिक आत्मीय संबंध में परिवर्तन दिखाई देने लगा है। नूतन परिस्थितियाँ, परिवर्तित परिवेश, नूतन आवश्यकताएँ आदि के प्रभाव परिवार पर लक्षित होने लगे हैं। बदलते परिवेश में नयी परंपराएँ नयी प्रथाएँ परिवार में शामिल होने लगी हैं। इन प्रथाओं और परंपराओं का प्रभाव परिवार के ढाँचे पर ही नहीं, परिवार के अंतर्गत संबंध और संवेदनाओं पर भी लक्षित होने लगा है। सूर्यबाला की कहानियों में पारिवारिक यथार्थ के धरातल पर स्थित परिवार का वास्तविक चित्रण हुआ है। इनके अंतर्गत व्यक्ति और परिवार का संघर्ष, घुटन, परिवार की आर्थिक स्थिती, उनका रूपागत परिवर्तन और व्यक्ति की स्वतंत्रता मुख्य हैं। परिवार में कुंठा, तलाक, टूटन, बिखराव बढते जा रहे हैं। बेरोजगारी मँहगाई दिन -ब-दिन बढ़ रही है। वर्तमान युग की विशेषता तीव्र गति और प्रतिस्पर्धा है, इसमें जो पिछड़ गया उसका अस्तित्व संकट में है।

सूर्यबालाजी की कहानियाँ - 'सुनो सुमित, सुनो सुलभ', 'सलामत जागीरें', 'गुफ्तगू' 'दूज का टीका' आदि में आज के भोगवादी जीवन की, और अधिक पाने की लालसा, स्वार्थ और अतृप्ति का रेखांकन किया है। भौतिक सुख और उपलब्धियों की अंधी दौड़ में मनुष्य स्नेह, ममता, त्याग जैसे मानवीय गुणों की बहुमूल्य नीधि खो रहा हैं। आज की पीढी के पास सबकुछ होने के बावजूद भी वह अतृप्त है। वह संवेदनहीन बनती जा रही है, उसकी परस्पर संवाद की कडियाँ टूट चुकी हैं। लेखिका अपनी कहानियों के माध्यसे नष्ट होते जीवन मूल्यों को बचाने का आग्रह करती है। बुद्धि तथा भावनाओं को अहमियत देकर मनुष्य-जीवन को स्वस्थ बनाने का संदेश देती हैं।'बाऊजी और बंदर' कहानि में परिवार में वृद्धों की समस्या और उनके साथ परिवारों के संबंध पर ही घर में, परिवार में मनुष्य के साथ कैसा व्यवहार किया जाता है यह दिखाया है।

आज नौकरी की जगहों पर प्रमोशन, डिमोशन, इंक्रीमेंट, करियर आदि बातें कहने-सुनने में सिर्फ थोड़ी सी नाप-जोख, महत्वाकांक्षा, तुलनात्मक प्रतिद्वंद्विता और व्यक्ति की घर से बाहर वाली जिंदगी से सरोकार रखती सी दिखती हैं। लेकिन ये वे प्रवंचनाएँ हैं जो व्यक्ति के समूचे व्यक्तित्व को तोड़-मरोड़क उसकी गरिमा और अस्मिता को लुंज-पुंज बनाकर उसे एक नाकारे जीव में बदलती हैं। इसी धरातल पर सूर्यबाल की 'पराजित', 'तोहफा' आदि कहानियों को देखा जा सकता है, जिनमें प्रमोशन पाने के लिए लोग किस तरह से वहशी बनते जा रहे हैं, इसका चित्रण हुआ है। आज शिक्षित युवा वर्ग को नौकरियाँ तो मिलती हैं लेकीन वे उसमें संतुष्ट नहीं रहते जिसकी वजह से यह बात नयी समस्याओं को जन्म देती हैं।

समकालीन दौर में गरीब बच्चों का शोषण भी समाज द्वारा किया जा रहा हैं। एक ओर बालमजदूरी दूर करने के लिए नारेबाजी करनेवाला समाज ही दूसरी ओर उनका शोषण करता है।'मटियाला तीत्तर', 'कपडे', इन संवेदनशील कहानियों का सृजन इसी धरातल पर हुआ हैं।

'तिलिस्म', 'क्या मालूम', 'सलामत जागीरें', 'कहा ना', 'न कित्री न', 'झील', 'सिर्फ मैं', 'कहाँ

तक', 'जैसी कहानियों में लेखिका ने नारी से संबंधित विविध समस्यओं को उभारा हैं। परिवार में स्थित नारी की विविध भूमिकाओं को निभाते हुए उभरनेवाली समस्याओं का चित्रण प्रस्तुत कहानियों में मिलता है। इनकी नारियाँ अपने अस्तित्व के साथ खोए हुए वजूद को फिर से ढुंढकर नई उम्मीद से जिंदगी जीने की शुरुआत करती हैं।

सूर्यबालाजी अपनी कहानियों में संवेदनशील स्थितियों का अंकन करने में सफल रही हैं। उनकी कहानियाँ पाठक के मन को छूती हैं और स्थितियों पर सोचने के लिए बाध्य करती हैं। इनकी कहानियों की भाषा संप्रेषणीय है। पात्रानुकूल एवं कथ्य को ध्यान में रखकर भाषा का प्रयोग किया है। कई कहानियों में बोलियों का प्रयोग मिलता है। कहावतें, मुहावरे, लोकोम्तियों का लेखिका ने कहानियों में उपयोग किया हैं। कई कहानियों में लोकगीत, लोककथाएँ भी मिलती हैं। इनकी कहानियों के शिल्प को देखा जाए तो लेखिका ने अधिकार कहानियों में नाटकीयता, सांकेतिकता, काव्यात्मकता, पत्र शैली, पूर्वदिप्ती शैली का उपयोग किया हैं। सूर्यबालाजी ने जो भाषा एवं शिल्प कथ्य को संप्रेषित करने के लिए अपनाया है, वह पाठक की रुचि को कम नहीं करता।

❖ ❖ ❖

# "अन्या से अनन्या......एक सफर"



श्रीमती उमा ज. प्रियोळकर

महिला उद्योगपति प्रभा खेतान की आत्मकथा स्त्री जीवन का एक जीवन्त दस्तावेज है। सती माँ को प्रणाम करके अपने भीतर की बची हुई स्त्री को प्रणाम कर साठ साल की उम्र में लेखिका आत्मकथा लिखती है।

आत्मकथा विधा के संबंध में अपने विचार व्यक्त करते हुए प्रभाजी आत्मकथा को लिखना 'स्टीप्टीज' का नाच कहती है। "आप चौराहे पर एक-एक कर कपडे उतारते जाते हैं। लिखनेवाले के मन में आत्मप्रदर्शन का भाव किसी न किसी रूप में मौजूद रहता है, मन के किसी कोने में हल्की ही चाहत रहती है कि लोग उसे गलत नहीं समझे कि जो कुछ भी लिख रहा है उसे सही परिप्रेक्ष्य में लिया जाय, पर दर्शक वृन्द अपना-अपना निर्णय लेने में स्वतंत्र है। उनका मन मे इस नाच को देखें या फिर पलटकर चले जाएँ।" पृ.२५५

मारवाडी परिवार में जन्मी प्रभा जी को विद्रोही जीवन विरासत में मिला। अकेलापन हमेशा साथ निभाता रहा। उन्हें जीवन का अर्थ समझाता रहा। अपने आपको बचाने के प्रयास में अपने मूल्यों को जीवन में सँजोती रही। टूटती गयीं बार-बार टूँटी....

पर कहीं चोट के निशान नहीं। दुनिया के पैरों तले रौंदी गई पर मिट्टी के लौंदे में परिवर्तित नहीं हो पाई। नौ वर्ष की उम्र में पिता को खो दिया और वहीं कही अपना कोमार्य भी।

बचपन में दाई माँ का ही सहारा था, वही एक मात्र आश्रय थी। अम्मा ने कभी गोद में लेकर चूमा नहीं। कभी प्यार नहीं किया क्योंकि वह ठहरी काली, माँ की तरह गोरी नहीं। चुपचाप घंटो अम्मा के कमरे के दरवाजे पर खडी रहती। शायद अम्मा भीतर बुला लें। मगर नहीं एक शाश्वत दूरी माँ-बेटी के बीच हमेशा बनी रही। माँ ने कभी उनकी बातों को समझा ही नहीं। अम्मा बच्चों को गुड -सत्तू देने के लिए खिलाफ थी। रेवडी खाने से बच्चों के पेट में दर्द होता है। इसलिए अम्मा रेवडी खाने को नहीं देती थी। एक दिन दाई माँ रेवडी लेकर आती है और प्रभाजी वह खाती है। परंतु प्रभा ने खाया तो कुछ भी नहीं होगा। 'प्रभा के सब पचता है।' अम्मा चिढकर कहती है। पृ. २६

प्रभा जी लिखती है कि मैं अपने ही घर में उपेक्षिता थी। आत्मसम्मान की कमी ने मेरा जिंदगी भर पीछा किया। वह बहुत शान्त स्वभाव की थी। बहन गीता की तरह स्मार्ट नहीं, मुँह पर फटफटा जवाब नहीं दे पाती, लेकिन पढने में वह अच्छी थी। क्या प्यार करने के लिए यह काफी नहीं था? लेकिन परिवार की छोटी को माँ का प्यार नहीं मिलता।

घर के शिक्षा विरोधी माहौल में प्रभाजी अपनी पढाई-लिखाई को जारी रखती है। एम.ए.की परीक्षा की फीस के पैसे भी सहेली से उधार लेकर भरती है। दर्शन शास्त्र में एम. ए. करने के बाद विदेश जाती है। चमडे की वस्तुओं का निर्यात शुरू करती है, ब्यूटी क्लिनिक खोलने के लिए ट्रेनिंग लेती है - ये सारे प्रसंग यहाँ है। इसलिए हम देखते है कि आत्मकथा में सिर्फ बीती जिंदगी भर की कहानी ही नहीं है, वरन इसमें देश और दुनिया की भी बातें है। दर्शनशास्त्र के अध्यापक डॉ चैटर्जी ने प्रभा को यह सिखाया कि आत्मा ही आत्मा का गुरू होता है। डॉ चैटर्जी प्रभा जी से यह गुरूदक्षिणा माँगते हैं - "स्त्री होना कोई अपराध नहीं है, पर नारीत्व की आँसू भरी जिंदगी स्वीकारना बहुत बडा अपराध है। अपनी नियती को बदल सको तो वह एकलव्य की गुरूदक्षिणा होगी।" पृ. २ कॉलेज में प्रभाजी के लिए एक नई दुनिया खुलती जा रही थी। एक बडी गहरी बात कहीं मन के भीतर जा बैठी थी कि उन्हें अम्मा, भाभी की तरह नहीं होना, घुटन भरी जिंदगी नियती को वे कदापि स्वीकार नहीं कर सकती है। अम्मा, जीजी, ताई, चाचियाँ, यहाँ तक कि स्कूल की शिक्षिकाएँ, हेड मिस्ट्रेस आदि को जो उनके जीवन में प्रेरणा स्त्रोत रही थी, उन्हें कहीं न कहीं प्रभा जी ने अपने जीवन में दुखी पाया।

लेखिका मन्नू भंडारी ने उन्हें चौथी से ग्यारहवीं तक पढाया। साहित्य की दुनिया में जिनके कदमों की छाप पर प्रभा जी ने चलना चाहा वे भी कहाँ इन आँसुओं की नियति से मुक्त हो पा रही थीं? अपनी इस माँ जैसी शिक्षिका को रोते हुए देखा। गलत पुरूष के हाथ में पडकर औरत कितनी असहाय हो जाती है यह भी प्रभाजी ने उसी दिन समझा था।

बाईस साल की उम्र में चालिस वर्षीय पेशे से चिकित्सक पाँच बच्चों के पिता डॉ. सराफ से वह रिश्ता बनाती है। उनका कहना है कि वह डॉ. साहब की रखैल नहीं है। क्योंकि वह स्वावलंबी है, अपना भरण पोषण खुद कर सकती है। वह डॉ. साहब पर आश्रित नहीं हैं।

दीन-दुनिया से बेखबर, समाज की सच्चाईयों से दूर अविवाहित रहकर एक विवाहित, पाँच बच्चों के पिता के साथ टँगे रहती है। ऐसे रिश्ते को दुनिया

अपनी नजर, अपने पैमाने, अपनी परंपरा से तौला करती है। दुनिया की नजर में पति-पत्नी के अलावा औरत-मर्द का हर रिश्ता नापाक और गलत है। इस बात को जानते हुए भी अपनी जिंदगी से भी ज्यादा डॉ. साहव से प्यार करती है। आत्मकथा में शुरू से अन्त तक स्त्री-पुरूष के इस अवैध रिश्ते के केन्द्र में प्रभाजी और डॉ. सराफ हैं। भारतीय समाज में ऐसे रिश्ते को अवैध-रिश्ता करार दिया जाता है। लेकिन प्रभाजी और डॉ. साहब ने इस रिश्ते को तब तक कायम रखा जब तक डॉ. साहब का निधन नही हो गया। आखिर क्या कारण हो सकता है कि एक संपन्न परिवार की युवती चालिस साल के व्यक्ति से पागल की तरह प्रेम करती रहे? इस प्रश्न का उत्तर भी प्रभा जी ने आत्मकथा में दिया है - "मेरा तो इहलोक-परलोक में कोई नहीं। हमेशा-हमेशा से अकेली हूँ। निःसंग रही हूँ। किसी को मुझसे प्यार नहीं। किसी को मुझपर ममता नहीं, किसी ने क्षण भर को नहीं सोचा कि मेरी यह अकेली जिंदगी कैसे चलेगी? स्नेह.... प्यार विहीन....थार का रेगिस्तान जैसा मेरा जीवन रहा है, जहाँ केवल अकेले चलती रही हूँ।" पृ... २६४... इसतरह की जिंदगी का वह चुनाव नहीं चाहती थी। उनके मन में भी घर गृहस्थी के पारंपारिक सुखों की चाहत थी।

डॉ. साहब के परिवार में प्रभा जी एक घुसपैठिया थी। अंतः डॉ साहब के परिवार को प्रसन्न रखना उनकी पहली जिम्मेदारी थी। इन जिम्मेदारियों का निर्वहन उनपर नहीं बल्की डॉ. साहब की पत्नी और बच्चों की इच्छाओं पर निर्भर करता है। डॉ. साहब की धर्मपत्नी का जब मन होता तब वे प्रभा जी को प्लैट में बुला लेती, अपनी गृहस्थी में शामिल करती। प्रभाजी भी डॉ. साहब का घर सजाती, उनकी बेटियों का दहेज इकट्ठा करती। अपने भीतर का अपराध बोध उनसे इतनी मेहनत, इतना त्याग करवा रहा था।

डॉ. साहब से हुई निराशा को प्रभा जी ने इन शब्दों में अभिव्यक्त किया है - "मैं वह अन्य थी जिसे निरन्तर निर्मित किया जा रहा था। मैं बस पति-पत्नी के बीच 'एक वह' थी। पृ.

अजीब सी दोहरी जिंदगी जी रही प्रभाजी को धीरे-धीरे वक्त के साथ पता चला था कि उन्होंने और डॉ. साहब ने जिस चाँद को साथ-साथ देखा वह एक नकली चाँद था। उनका अपराध सिर्फ यह था कि वह डॉ. सराफ से प्यार करती है वैसे ही जैसे लेकिन हजारों स्त्री पुरूष प्यार करते हैं उनकी शादी हो जाती है। और यदि शादी नहीं होती तो वे अलग-अलग हो जाते हैं। प्रभाजी के जीवन की त्रासदी तो यह थी कि न उनकी डॉ. साहब के साथ शादी हो सकती थी, न वह डॉ. से अलग हो सकती है। और बिना शादी के समाज में उनकी कोई पहचान नहीं बन सकती है। डॉ. साहब से उनकी शादी की कोई संभावना नहीं थी क्योंकि मिसेज सराफ ने इस रिश्ते पर आँसू जरूर गिराए पर उन्होंने कभी अपने पति से तलाक नहीं चाहा। उनकी असहाय छबि से सबको सहानुभूति थी, खुद डॉ. साहब को भी इस छबि के सामने झुकना पडा।

क्रूर समाज, क्रूर परिवेश में अपना ही कटा हुआ सर अपनी हथेलियों पर लिये घूम रही प्रभा जी को एक चरम मानसिक यंत्रणा को भोगते रहने को, एक स्थायी आतंक को झेलते रहने को बाध्य थी। फिर भी उन्होंने बेहतर भविष्य का सपना देखना नहीं छोडा। वह मानती है कि व्यक्ति अपने सपनों के सहारे काफी कुछ पा सकता है। वह सोचती है- "मैं एक सपना देख रही थी। उस सपने में मै एक सबल और सशक्त महिला थी। इस समाज में मेरी भी एक ऊँची हैसियत थी। लेकिन यह सपना सच कैसे हो?

मेरी जिंदगी तो मानो कहीं गिरवी है। जिंदगी पर मेरा अपना नियंत्रण ही नहीं।" पृ. १९६

कुंठाओं से निकलने का एक ही रास्ता उन्हें नजर आया कि वह अपना निर्यात का व्यापार खडा करें। कम से कम देश विदेश तो घूम सकेंगी, लोगों की नजर में इज्जत मिलेगी सो अलग। बाहरी दुनिया में कदम रखते ही उनकी कार्यक्षमता दुगनी हो गई। उन्होंने अनुभव किया कि डॉ. साहब से अलग भी मेरी कोई हैसियत है, मैं भी कुछ हूँ। प्रभा जी व्यापारी महिला बन चुकी थी। मजदूर युनियन, सर्वहारा को उन्होंने अपनी व्यापारी की दुनिया में जाना। वर्गीय चेतना कैसे फैक्ट्री फ्लैट पर सघन होती है इस प्रभाजी ने भली भाँति समझा। स्त्री के रूप में वह चाहे दमित और शोषित थी, मगर व्यापार की दुनिया में वह व्यापारी पुरूषों के मूल्य बोध को स्वीकार कर स्ट्राँग बनती जा रही थी।

इन्हीं दिनों उन्होंने अनुभव किया कि जिन बातों को जीवन की अपनी जिन कमियों को वह पहले सहन कर लेती थी अब सहन नहीं कर पाती थी। क्योंकि प्रभाजी ने अनुभव किया कि वे सशक्त और दबंग होती जा रही थी। उनका आत्मविश्वास बढता जा रहा था। डॉ. साहब का उनके बारें में कहना था - "तुम पुरूष होती जा रही हो .... आर्थिक निर्भरता प्रभा जी के जीवन की महत्त्वपूर्ण उपलब्धि थी। जो मारवाडी समाज उन्हें मंचासीन नहीं देखना चाहता था उसी समाज ने उन्हें कलकत्ता चेंबर ऑफ कॉमर्स की प्रथम महिला अध्यक्षा का पद प्रदान किया। व्यापार प्रभाजी कर रही मगर पैसे का कंट्रोल डॉ साहब कर रहे थे। आर्थिक रूप से आत्मनिर्भर होते हुए भी उसकी नकेल डॉ. साहब के हाथ में थी। इसे प्रभाजी अपनी रूग्ण निर्भरता कहती है - "एक रूग्ण निर्भरता, डॉ. साहब मेरे लिए सुरक्षा के प्रतीक थे। मानो उनके लिए मैं जिन्दा थी, उनको कुछ हो जाए ऐसा मैं सोच भी नहीं पाती। डॉ. साहब मेरे लिए बरगद की छाँव थे।" - पृ. १४

डॉ. साहब से निःस्वार्थ प्रेम करने के बावजूद उन्हें जगह जगह अपमानित होना पडता है। लोग उन्हें बदनाम बुरी औरत मानते है - लोग उनके बारें में चर्चा करते हैं - "बेचारी प्रभा खेतान...." "इसे हम कैसे अपने घर बुलाएँ?" "इससे कैसे दोस्ती करें?" "पूछेंगें नहीं लोग इसके बारे में-"

फिर भी डॉ. साहब से अलग होने की कल्पना से ही प्रभा जी कातर हो जाती है। इन्हीं दिनों उन्होंने देखा कि  डॉ. साहब उनके प्रति ईमानदार नहीं रहे थे। उनका मन किसी अन्य स्त्री में रमने लगा था। वह बदले की आग में धधकती हुई सोचने लगी कि डॉ. साहब किसी और को खोज सकते हैं तो मैं क्यों नहीं खोज सकती? प्रभा जी बदले की आग में एक परिचित पुरूष के नजदीक आती है। परंतु वह जान जाती है कि यह सिर्फ शारीरिक भूख है वह उस व्यक्ति से प्रेम नहीं करती। प्रेम और वासना का फर्क प्रभा जी को उस दिन समझ में आया। "प्रेम सर्कस का नाम नहीं, जिमनास्टिक का खेल नहीं..." पृ. २५३। उनकी समझ में आ गया कि प्रेम कभी देह पर आधारित नहीं हुआ करता, देह की भूमिका गौण है। मन को भी वह चेतन-अवचेतन में विभक्त नहीं करती प्रभाजी मन को एक ही मानती है जो सिर्फ समपर्ण की आज्ञा देता है।

प्रभा जी ने गरीब मुसलमानों की समस्या प्रधान तालतल्ला गली, कलकत्ता के छात्र जीवन की हलचलों, नक्सवाद की बाढ और अन्ततः वामफ्रण्ट की सरकार का पदारूढ होना आदि घटनाओं को आत्मकथा में समाहित  किया है। तालतल्ली गली वहाँ है जहाँ उनकी फैक्टरी है। सब तरफ भूख और

